**भोर वन उपविभागांतर्गत सासवड वनपरिरक्षेत्रातील मौजे वाल्हा ता.पुरंदर, जि.पुणे येथील निसर्ग पर्यटन अंतर्गत सन २०१८-१९ मध्ये करावयाच्या चेनलिंक फेन्सिंग व गेटसह कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.निसप-२०१८/प्र.क्र.२६३/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८**

वाचा :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/लेखा/प्र.म/प्र.क्र.२४/३५०/२०१८-१९, दिनांक २३.०७.२०१८.

**प्रस्तावना:-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.),पुणे यांचे अधिपत्याखालील भोर वन उपविभागांतर्गत सासवड वनपरिक्षेत्रातील मौजे वाल्हा ता.पुरंदर, जि.पुणे येथील निसर्ग पर्यटन अंतर्गत सन २०१८-१९ मध्ये करावयाच्या चेनलिंक फेन्सिंग व गेटच्या कामाचे अंदाजपत्रक शाखा अभियंता, पुणे मंडळ, पुणे यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कनिष्ठ अभियंता, वन अभियंता कार्यालय, नागपूर व उप वन अभियंता, पुणे वन मंडळ, पुणे यांनी साक्षांकित केले आहे. वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी रु.३०,१२,२००/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे .

संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने अंदाजपत्रकाचे छाननीअंती भोर वन उपविभागांतर्गत सासवड वनपरिरक्षेत्रातील मौजे वाल्हा ता.पुरंदर, जि.पुणे येथील निसर्ग पर्यटन अंतर्गत सन २०१८-१९ मध्ये करावयाच्या चेनलिंक फेन्सिंग व गेटसह कामाच्या जी.एस.टी.सह व ४ टक्के आकस्मिक खर्चासह एकूण रू.३०,१२,२०० इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भोर वन उपविभागांतर्गत सासवड वनपरिरक्षेत्रातील मौजे वाल्हा ता.पुरंदर, जि.पुणे येथील निसर्ग पर्यटन अंतर्गत सन २०१८-१९ मध्ये करावयाच्या चेनलिंक फॅसिंग व गेटसह कामाच्या जी.एस.टी. सह व ४ टक्के आकस्मिक खर्चासह एकूण रू.३०,१२,२०० इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस  व सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्या् येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४१३०९१०२३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.10.24 13:17:42 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे
४. उपविभागीय वन अधिकारी, भोर उपवन विभाग, भोर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

"प्रपत्र-अ"

शासन निर्णय क्रमांक :-निसप-२०१८/प्र.क्र.२६३/फ-९, दिनांक २४ ऑक्टोबर,२०१८

NAME OF WORK :- CONSTRUCTION OF CHAIN LINK FENCING WITH R.C.C. MAIN GATE AND WICKET GATE AROUND FOREST COMPARTMENT NO.517 (GAT NO.374) AT VALHA IN SASWAD RANGE IN BHOR FOREST SUB-DIVISION

Recapitulation Sheet

| S.N. | PARTICULARS | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1 | Work Portion | 25,89,313.00 |
| 2 | Quality Control Testing Charges | 7,400.00 |
| 3 | ADD 12% GST | 3,11,606.00 |
| 4 | **ADD** 4% FOR CONTINGENCIES CHARGES | **1,03,869.00** |
| | **Total:-** | **30,12,188.00** |
| | **Say Rs.** | **30,12,200.00** |

******